**यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पुणे येथील विभागीय केंद्र इमारतींचे बांधकाम करण्यास विधीमंडळाच्या डिसेंबर-२०२१ च्या हिवाळी अधिवेशनात अर्थसंकल्पित झालेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.बैठक-२०२१/प्र.क्र.३६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :- विभागाचा समक्रमांकाचा दि.२५.११.२०२१ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना :-**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक विद्यापीठाची स्थापना महाराष्ट्र विधी मंडळ कायदा क्र.२० अन्वये दि.०१.०७.१९८९ रोजी झाली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची मान्यता असलेल्या या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र राज्य आहे. महाराष्ट्रात या विद्यापीठाची अमरावती, नागपूर, औरंगाबाद, मुंबई, नाशिक, पुणे, कोल्हापूर व नांदेड असे ८ विभागीय केंद्र कार्यरत आहेत. विद्यापीठाच्या ८ विभागीय केंद्रामार्फत १६०० अभ्यासकेंद्रावर नियंत्रण ठेवले जाते. विद्यापीठाची जवळपास ६ लक्ष इतकी विद्यार्थी संख्या आहे. पुणे विभागीय केंद्रातंर्गत पुणे, सातारा व सोलापूर येथे अनुक्रमे १६०, ३६ व ७१ अशी एकूण २६७ अभ्यासकेंद्र असून, या अभ्यासकेंद्रावर एकूण १ लक्षपर्यंत विद्यार्थी प्रवेश घेतात. सद्यस्थितीत पुणे विभागीय केंद्राचा कारभार पुणे महानगरपालिकेच्या अंतर्गत असलेल्या शाहीर अण्णाभाऊ साठे प्रशाला गृह येथून चालविला जात असून सदरची जागा महानगरपालकिने भाडेत्तवावर तात्पुरत्या स्वरुपावर दिलेली आहे. सदरची जागा वाढती विद्यार्थी संख्या व अभ्यासकेंद्रे यांना सेवा देण्याच्या दृष्टीने पुरेशी नसल्याने बालेवाडी पुणे येथे सर्व्हे नं.४२/११, १२, १८ येथे ३४७५ चौ.मी ४९ व सर्वे नं.४२/२०, २१ येथे १०७७.२८ चौ.मी. असे दोन्ही प्लॉट मिळून एकूण ४५५२.७७ चौ.मी. जागा सफायर पार्कसमोरबालेवाडी, अमित एन्टरप्राईजेस, पुणे या ठिकाणी बांधकाम करण्यासाठी रु.११८५.३१ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास दि.२५.११.२०२१ रोजीच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये काही अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

बालेवाडी पुणे येथे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पुणे विभागीय केंद्र या इमारतींच्या बांधकाम करण्याकरीता येणाऱ्या खर्चासाठी विधानमंडळाच्या डिसेंबर, २०२१ च्या अधिवेशनात सन २०२१-२२ करीता पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला रु.८६,९५,०००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष पंच्यान्नव हजार फक्त) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बालेवाडी पुणे येथे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे पुणे विभागीय केंद्राच्या इमारतींच्या बांधकामासाठी रु.८६,९५,०००/- (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष पंच्यान्नव हजार फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१. हा निधी प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच वितरीत तथा आहरीत करण्यात यावा.

२. चालू आर्थिक वर्षात विधीमंडळाच्या निदर्शनास आणलेल्या कामनिहाय तरतूदीपेक्षा जादा खर्च करण्यात येऊ नये.

३. कोणत्याही परिस्थितीत संबंधित अधिक्षक अभियंता यांनी प्रशासकीय मान्यतेच्या रकमेपेक्षा जास्त खर्च कामांवर करु नये.

४. संबंधित कार्यकारी अभियंता यांनी कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल संबंधित विद्यापीठाचे कुलसचिव व संचालक, उच्च शिक्षण यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

५. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. हा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाने विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करावा. निधी वितरीत करतांना वरील अटी व शर्ती विचारात घ्याव्यात. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

४. सदरहू बांधकामावर होणारा खर्च "मागणी क्रमांक - एच-८, मुख्यलेखाशिर्ष- ४२०२ शिक्षण, सर्वसाधारण शिक्षण २०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण (४२०२००७९) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.९१/२०२२/व्यय-५, दि.२८.०१.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०२१८११२१२४०७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2022.02.18 11:23:36 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
४. कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
८. कार्यासन अर्थसंकल्प-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. उप सचिव (विशि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती.